**मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प,पुणे यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता कोयना बांधकाम मंडळ, सातारा अंतर्गत असलेले विभाग व उपविभाग गुणनियंत्रण मंडळ,पुणे यांचेकडे वर्ग करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक :-गुनिवि-२००९/(१२३/२००९)/निवसं-३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांकः ०७/१२/२००९-

**प्रस्तावना :-**

सद्यःस्थितीत कोकण प्रदेशातील प्रकल्पांचे गुण नियंत्रण पुणे व कोल्हापूर या दोन गुण नियंत्रण विभागामार्फत पहाण्यात येते. सध्या या यंत्रणेमार्फत एकूण २१ मोठे, ३४ मध्यम, १३ लघु व १६ उपसा सिंचन योजना अशा ८४ प्रकल्पांच्या गुण नियंत्रणाची कामे प्रगती पथावर आहेत. तसेच महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प टप्पा-१ अंतर्गत नव्याने ३ मोठे, ३ मध्यम व ७९ लघु अशा एकूण ८५ अतिरिक्त प्रकल्पांची कामेही या यंत्रणेकडे सोपविण्यात आली आहेत. अशा प्रकारे एकूण १६९ प्रकल्पांची कामे गुण नियंत्रणासाठी या यंत्रणेकडे आहेत. सदर कामे पुणे, अहमदनगर, उस्मानाबाद, बीड, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, सोलापूर, कोल्हापूर, सांगली अशा १२ जिल्हयातील आहेत.

पुणे व कोल्हापूर या दोन विभागामार्फत कोकण प्रदेशातील प्रकल्पांची गुण नियंत्रणाची कामे पहाणे लांब पल्ल्याचे तसेच अडचणीचे होते. त्यामुळे कोकण प्रदेशातील गुण नियंत्रणाची कामे सुलभ व प्रभावीपणे होण्यासाठी तसेच गुणनियंत्रणाच्या कामाच्या व्याप्तीचा विचार करता कोकण प्रदेशातील प्रकल्पांच्या गुणनियंत्रणाच्या कामांसाठी गुणनियंत्रण मंडळ, पुणे अंतर्गत एक विभाग व उपविभाग वर्गीकरणाने/स्थलांतरणाने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा अंतर्गत असलेले कार्यकारी अभियंता,बांधकाम विभाग क्र.२ अलोरे हे कार्यालय अधीक्षक अभियंता, गुणनियंत्रण मंडळ, पुणे यांचेकडे गुणनियंत्रण विभाग, चिपळूण या नावाने वर्ग करण्यात येत आहे. तसेच अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा अंतर्गत कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग क्र.२ अलोरे अंतर्गत असलेला कोयना बांधकाम उपविभाग क्र.२(ब), अलोरे हा उपविभाग गुणनियंत्रण उपविभाग, रत्नागिरी या नावाने गुणनियंत्रण विभाग, चिपळूण अंतर्गत वर्ग करण्यात येत आहे.

२. अधीक्षक अभियंता, गुणनियंत्रण मंडळ, पुणे यांच्या अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता, गुणनियंत्रण विभाग, पुणे अंतर्गत कार्यरत असलेले १) गुणनियंत्रण उपविभाग माणगांव, २) गुणनियंत्रण उपविभाग, भातसानगर आणि कार्यकारी अभियंता, गुणनियंत्रण विभाग, कोल्हापूर अंतर्गत कार्यरत असलेला १) गुणनियंत्रण उपविभाग, फोंडा असे एकूण ३ उपविभाग कार्यकारी अभियंता, गुणनियंत्रण विभाग, चिपळूण या कार्यालयास जोडण्यात येत आहेत.

३. या स्थलांतरणाने/वर्गीकरणाने कार्यकारी अभियंता, गुणनियंत्रण विभाग, चिपळूण अंतर्गत १) गुणनियंत्रण उपविभाग, माणगांव, २) गुणनियंत्रण उपविभाग, भातसानगर, ३) गुणनियंत्रण उपविभाग,फोंडा ४) गुणनियंत्रण उपविभाग, रत्नागिरी हे ४ उपविभाग कार्यरत राहतील.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.आईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.८ मार्च,१९८४ मधील तरतूदीनुसार संबंधित मंडळ व विभाग कार्यालयांच्या अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. या प्रकरणी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष ४७०१ (८०) (००१) (०१) (०६) 'दत्तमत' 'संचालन व प्रशासन' या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

६. ज्याठिकाणी हेतुबदल होत आहे ती बाब लाक्षणिक पूरक मागणीद्वारे यथावकाश विधान मंडळाच्या निदर्शनास आणण्यात येईल.

७. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/९२ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार आणि नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१९/व्यय-१२, दिनांक २९/१०/२००९ अन्वये प्राप्त झालेल्या मंजूरी नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २००९१२०७१७५८४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( ज. प्र. जहागिरदार )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
मा.मंत्री (कृष्णा खोरे) यांचे स्वीय सहायक
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे
अधीक्षक अभियंता, गुणनियंत्रण मंडळ, पुणे
अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा
सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
सर्व जिल्हाधिकारी
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
(कार्यालयांचे बदलाबाबत आवश्यक ती नोंद घ्यावी)
कार्यासन आ (प्रशि)/वर्ग-१/वर्ग-२
निवडनस्ती धारिका.